ई-साहित्य प्रकाशन

अंक ४२, दिनांक ४ सप्टेंबर २००९

# नेटअक्षरी



...मी...

आकाश व्यापताना
जमिनीत रुतलो मी...
सुर्यास गाठताना
चंद्रास भेटलो मी...
पाताळ मापताना
स्वर्गात साठलो मी...
अश्रुंत पोहताना
हास्यात डुंबलो मी...
रेखांश मोजताना
दिशांत फाटलो मी...
वेगात धावताना
मंदीत रुतलो मी...
न्यायास शोधताना
अन्याय पाहीला मी...
अंतीम त्या क्षणाला
पण डाव साधीला मी...

मकरंद सखाराम सावंत (मुंबई)


अतिथी संपादक

संपादक

भारती सरमळकर (मुंबई)

सह संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
अहं ब्रह्मास्मि (पुणे)
सचिन काकडे (मुंबई)

# संपादकीय..................

ह्या धावपळीच्या आयुष्यात आपण सर्व श्वास तर घेतोय पण कुठेतरी हे सोयीस्करपणे विसरत चाललोय की आपणही एक माणूस आहोत. स्पंदनांची दुलई ओढलेलं एक नाजुक हळवं सुंदर मन ह्या **"माणूस-माणूस"** नावाच्या पोषाखाखाली राहतय. खरच आपल्याला इतकाही वेळ नसतो की रस्त्यावरुन जाताना कडेला कधी मुर्ती बनवणा-या स्त्री मुर्तिकाराला पाहायला? ती ब-याच मुर्ती बनवत असते... कधी मीरेची मुर्ती बनवताना तिला पहा... **"ती, मीरा आणि मुर्ती"....** तिचं नशीब उघड्यावर पड्लेल असत पण तिची कारागीर बोट एका निस्सिम निस्वार्थ मीरेला घडवत असतात...अहा!!...मीरा.... काय लिहावं? आणि कस लिहावं? त्या समर्पण आणि त्यागाच्या मुर्तीकडे पाहील्यावर तर शब्दच थिटे पड्तात ....पण मीरा आजही आहे कुठे न कुठे प्रत्येक मुलीत...तिच्या प्रेमात...तिच्या भावनांत...आणि **"तुला बरोबर घेऊन भिजणारा पाऊस"** अस म्हणत आतुरतेने तिच्या सख्याची आणि पावसाची वाट बघत बसणा-या तिच्या आर्त डोळ्यांत..... येतो तो आणि बरसून जातो....आणि तो गेला की सर्व कस शांत, सुन सुन होत.....आणि मग पुन्हा एकदा नैराश्याच, उदासिनतेच सावटं येत मनावर....आणि ऊरुन राहतो फक्त एक निशब्द, दाट **"काळोख"....** मनातला....एका कोवळ्या शलाकेच्या प्रतिक्षेत....आणि मग हे मन उजळून निघतं तिच्या येण्याने.....प्राजक्त, निशीगंध, मोगरा, रातराणी सर्व काही बहरून येत तिच्या आगमनाने....अंगणातील सुकलेल तुळशी **"वृंदावन"** सुद्धा तिच्या हातून पाणी प्यायला उत्सुक असत........ इतक सगळं असुनही एक अतृप्त मन देवाचा धिक्कार करतच असत....पण शेवटी देवच तो....मनापासून प्रार्थना केली की देवही मिळतो म्हणे....मग **"बाप"** होण्याचं सुख आणि वरदान न मिळेल तर नवलच.....आनंदी, तृप्त, धन्य धन्य होऊन ते मन मग देवाचे उपकार मानतं....थोडीशी आर्जव, थोड्या तक्रारी पण तरीही **"उपकार तुझे फार देवा"** अस म्हणतं.....सरते शेवटी स्वःतातच डोकावुन बघत..... स्वःताचीच खोली मोजु लागतं....अगदी काठोकाठ भरलेल्या तलावाप्रमाणे.....**"तलाव"** आणि मन..... हम्म्म्म्म्म एकच की??? हा तुमचा संभ्रम ह्या अंकात नक्कीच दुर होईल अशी माझी खात्री आहे......

माझ्या आवडीच्या काही निवडक दर्जेदार काव्य रचना आज ह्या अंकात सादर करत आहे....नेहमी प्रमाणेच आमच्या नेटाक्षरीच्या सर्व रसिक वाचकांना हा अंक वाचताना आनंद व समाधान मिळेल ही आशा......

**भारती सरमळकर - (मुंबई)**
**संपादक**

# ...माणूस माणूस...



माणूस माणूस काल
बाजारी इकला,
स्वता:चाच पैश्यापाई
लिलाव केला...!!

झाला बाजारी सारं
जलम उधारी,
झाला सा-याचाच बाजार
सार सार्थापाई...!!

जगावं म्हटलं तर
जगण मरुण गेलं,
मेलेल्या त्या मढ्यावरच
कफण इरगळून गेल...!!

झाला सा-याचा बाजार
बघल तिकडं लिलाव,
डोया देखत खुन खराबा
बघल तिकड मयत...!!

झाला लिलाव लिलाव,
ह्यो माणूस इकला,
सार्थासाठी पैशाचा
तिथ पाऊस पडला...!!

कुठला माणूस, कुठली नाती
सार्था पाई ती बाजारी इकली,
जगला तो जगला स्वार्थी
त्यावरी त्यांन झाकूनी माती...!!

नाही राहीला माणूस
इसकटला धरम सारा,
केल त्यांन पाप सार
पापाचाच भोग सारा...!!

माणूसातली माणूसकी
या जगात इठली,
त्यांन पशासाठी ती
बाजारी इकली...!!

## ...आनंद राजगोळे...

# ...ती मीरा आणि मूर्ती...

‘ती’ रस्त्याच्या कडेला उभी वर्ण सावला
समोर बसलेली एक धवला
‘ती’च नाव वगैरे कोणास ठाऊक
समोर बसलेली मात्र मीरा

‘ती’च्या नेत्रात स्फुंदतो कोणा आपल्याचा वियोग
मीरेच्या नयनी मात्र रंगतो उधाणतो भक्तियोग
‘ती’चे हात खरबरीत रक्ताळलेले हाती हातोडा अन छिंन्नी
मीरेचे हात नाजूक कोरलेले ....हाती एकतारी...



‘ती’ ची साडी रंगीत पण जीर्ण
मीरेची साडी साधीच पण शुभ्र वर्ण
‘ती’चे ओठ फुटलेले बोलती शब्द जाहिरी
मीरेचे कोरीव ओठ विष प्राषूनही शांत संगमरवरी

मूर्ति पूर्ण झाली मीरा पूर्ण हरिनामात मग्न
मूर्ति पूर्ण झाली ‘ती’अपूर्ण आयुष्याचे अवशेष भग्न

## ...हर्षद कुलकर्णी...

# ...तुला बरोबर घेऊन भिजणारा पाऊस...

तुला बरोबर घेऊन भिजणारा पाऊस आज नव्हता,
मला तुझ्या मिठीत शिरायला लावणारा पाऊस आज नव्हता,

तशी माझी अन पावसाची गट्टी फ़ार छान ...
तरीही तुला सोबत घेऊन येणारा पाऊस आज नव्हता



रोज येणाऱ्या पावसाबरोबर तुझी वाट बघायचे मी,
अन परतताना त्याच्याकडे तुझ्यासाठी निरोप धाडायचे मी,

निरोप वाटतं तुझ्याकडे पोहोचलेच नाहीत...
कोसळणाऱ्या त्या पावसात गळून गेल्याशिवाय राहिलेच नाहीत

आताशा पाऊसही माझ्यासारखा एकटा...
बरसत नाही तो जिथे असेल गलका,
एकटा कुठेतरी जाऊन बरसून येतो,
कुणालाही मागमूस न लावता...
कुणालाही मागमूस न लावता...

**...पूजा कोरगांवकर...**

## ...काळोख...

रात्री बंद केल्यावर घराचं दार,
दाराबाहेर काळोख ऊभा असतो,

एखादं झाड स्मशानात एकटं एकटं स्तब्ध उभं असतं तसं,

अलिकडे मी घरात असताना प्रकाशात असलो जरी,
दाराबाहेरील उभ्या काळोखाचं एक “अबोल” भान असतं,
मग थोडा वेळ बाहेर जाऊन तिथला दिवा लावतो,
आता काळोख नसतोच मुळी तिथे,
मग दार दिवा चालू ठेवून मी पुन्हा घरात येतो,
आता प्रकाश घरात आणि घराबाहेर सुद्धा

पण....?

हा

काळोख...

आता माझ्या “मनात” उभा.



...मंदार कवीनकर...

# ...वृंदावन...

तुझ्या माझ्या घराच अंगण पाहिलं
की मन आजही थरारत
जस पहिल्या अवचित सरींनी
पान अन पान शहारतं

माझ्याकडचा निशिगंध वेडा
आजही तसाच बहरतो
तू यावीसा खुडण्यास  म्हणून
गंध तुझा घरभर फिरवतो

तू लावलेला मोगरा
आजही जोमाने फुलतो
हलकासा सुगंध  त्याचा मग
माझ्या मनात सलतो

अंगणातली रातराणी तुझी
आजही निस्तब्ध आहे
माझ्या घरचा प्राजक्त मात्र
तिच्यावरच लुब्ध आहे

आपण मिळून लावलेल?
रोपही आज लाजत
माझ्यावरून वाहिल्या वा-यानेही
लगेच पान मिटत

माहेरी आलीस की एकदा
बाजूच्या वृंदावनात येऊन जा
अजूनही तहानेल्या तुळशीला
पाणी थोडं देऊन जा



## ...विनायक उजळांबे...

# ...बाप...

आज बापाला
म्या शिव्या घातल्या

मले,
जनम दिला मायवानी
उब दिली,
मायेची पाखरावानी
दुनियेच्या जत्रेत मले फिरवीले
पोटच्या पोरावानी
काय काय नाय केले?
बापावानी

पन,
मले बाप नाही बनवले
सोतावानी
मले बाप नाही बनवले
सोतावानी



मह्या शिव्या आईकून
येक पोर आली
भिकारी भिक मागायला
मले बी बाप नाही
तुज्यावानी
मले बी बाप नाही
तुज्यावानी

देवळात मी तिला घेतले
मांडीवर बापावानी
उभा होता नेहमीसारखा
गाभा-यात बापावानी

...अतुल मुळ्ये...



## ...उपकार फार देवा...

राहू कसा उपाशी ? उपकार फार देवा
पोटात टाकलेल्या चिंता हजार देवा

आकाश तारकांचे लिहीले जरी नशिबी
केव्हा तुला कळाला माझा नकार देवा

लावायला पणाला पत्नी असे न भाऊ
खेळू नव्या जगाशी कुठला जुग़ार देवा

कुठल्या गुहेत गेलो ना मंदिरात गेलो
गेलास काळजाच्या आरपार देवा

पाहून आज मजला ना हासते जराशी
माझा कुठे तिच्याशी झाला करार देवा

आपापसात लढले भगवे निळे नि हीरवे
रंगात लाल होता त्यांचा थरार देवा

**...खेळाडू...**

# ...तलाव...

प्रत्येक सायंकाळी
तलाव दगड झेलायचा
कित्येक तरंगांच हसू
त्या बदल्यात फुलवायचा

राग लोभ सुख दुःख
सारे सारे दगड माझेच
अन तहान भागवतील असे वाटणारे
कोरडे ढ़गही माझेच

तळात राहून कंटाळलेली
दलदलही माझीच
अन काठावरली भिजरी मनं
ती देखील माझीच

ते तरी नक्की माझेच का ?
की सगळा फक्त देखावा ?



आता तलाव हादरला
एकाकीपणाने पोखरला
तरीही “ माझंच काही चुकल का?”
ह्या प्रश्नापाशी ठेचाळला

आपले आपल्या जवळ आहेत
हे फक्त वाटण्यातच का उरावं
आत्म्याशी नातं ठरवण्यात
अख्खं आयुष्य सराव ?

..

..

..

आताशा तलाव आटलाय
स्वतःची खोली मोजण्यासाठी
अनं गावकरी प्रस्ताव मांडताहेत
कृत्रिम तलाव बांधण्यासाठी

**...अमृता ढगे...**

# अतिथी संपादकाच्या लेखणीतून ...



**नाव : मकरंद सखाराम सावंत**

**नोकरी : शिक्षक**

**वास्तव्य : मुंबई**

वयाच्या १४/१५ व्या वर्षी कुसुमाग्रजांचं विशाखा हातात पडलं तेव्हा फक्त एवढच माहीत होतं की "वेडात मराठे वीर दौडले सात" ही कविता ह्या पुस्तकात आहे. पण जसा जसा वाचत गेलो तसा तसा वाचतचं गेलो. अजूनही वाचतोय. मी म्हणतो ना मला कविता करता येतं नाही......ती मला होते. विशाखा बद्दल पु. ल. म्हणतात "मला आठवतं नाही माझा जन्म कुठल्या नक्षत्रावर झाला पण माझ्या तारूण्याचा जन्म हा कुसुमाग्रजांच्या विशाखा या नक्षत्रावर झाला".

मग मात्र चटक लागल्यासारखा वाचायला लागलो आणि कविता झाली. अजूनही वाचतोच, अजूनही वाचतोच म्हणून कदाचित आजही कविता होतेच ती मला करता येतं नाही.
कदाचित जेव्हा हे वाचन थांबवेन तेव्हा मला करावी लागेल देव करो आणि तसा दिवस न येवो. कविता रात्र रात्र भर झोपू देतं नाही गजल पहाटे ३ / ४ वाजता उठवते हा अनुभव ज्याना ज्याना असेल त्यांना नक्कीच कळेल कविता होते म्हणजे नक्की काय होतं ?

कधी खेबुडकर सारख्यांना भेट्ल्यावर किंवा भीमराव पांचाळेंना ऐकल्यावर ४ / ५ कविता होतात नाहीतर वर्ष वर्षभर हात धजत देखील नाही काही लिहायला, सर्व त्या
वरच्याची करामत, अर्थातच गदिमा म्हणतात तसं म्हणाव वाट्त

"ज्ञानीयाचा वा तुक्याचा तोच माझा वंश आहे
माझीया रक्तात थोडा ईश्वराचा अंश आहे"

पुढे मला प्रेमात पाडल ते ह्या गजलकारांनी अगदी मीर तकी मीर पासून ते भटांपर्यंत सगळयांनी ते चालवत होते मी चालत होतो, ते लिहवत होते मी लिहीत होतो. अगदी आजसुध्दा चार चार दिवस भटांची एकच ओळ मनात रहाते जशी " श्वास तुझा मालकंस स्पर्श तुझा पारिजात " आणि वेड लागल्यासारखा तीच ओळ मन गातं रहातं अखंड महिनोनमहिने अशा ताकादीची कविता होईपर्यंत पांढ-यावर काळ करत रहाव हाचं मानस अन हीच ईच्छा.

**मकरंद सखाराम सावंत**

# ती.....

ती बोलते डोळ्यातुनी
ती हासते डोळ्यातुनी
ऑोटांतुनी ऑोटांकडे
झेपावते डोळ्यातुनी

सांजावल्या रात्री पुन्हा
तेजावते ज्योती जशी
हेलावते मंदावते
मालावते डोळ्यातुनी

रागावते ती हासता
प्राजक्त ही भारावला
ते भेटती डोळे पुन्हा
वेडावते डोळ्यातुनी

कधी रात वेडी काजवे
कधी पावसाळी तारवे
कोजागीरीचा चांदवा
न्याहाळते डॉळ्यातुनी

ती सांज रोखुन मापते
ती सागराला हासते
ती पाहते ती पाहते
डोळ्यांकडे डॉळ्यातुनी

वाळुवरी ती चालता
वाळु हसे वेड्यापरी
वाळुसही ऑोलावते
ऑोलावते डॉळ्यातुनी

केव्हा तरी डॉळ्यापुढे
पाणीच वाटे दाटले
पाण्यासही पाणावता
पाणावते डॉळ्यातुनी

मकरंद सखाराम सावंत (मुंबई)

अतिथी संपादक

काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

=====================================

नवरस काव्यस्पर्धा मालिका

=====================================

यात आहेत साहित्यातील नऊ रस प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा एक महा मालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!

काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ' हा नाही,
कोणी छोटे - मोठे, कविता चांगली वाईट सिध्द करण हा ही नाही .
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे , सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवडक कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द होतील. हजारोंपर्यंत जातील. बक्षिसेही असतीलच.

लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते.

=====================================

या महिन्याचा '**रस**' विषय '**भक्तीरस**'

=====================================

तुमच्या १/२ '**भक्तीरस**'पूर्ण कविता आम्हाला १५ सप्टेंबर २००९ पर्यंत
**marathikavitamarathispardha@gmail.com**
वर पाठवा.

सोबत आपल्या ओरकूट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा..
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ४०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार हीं इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**netaksharee@gmail.com**